**मृत बंदी मदनय्या रामय्या लेंकला, मोर्शी खुले कारागृह जि. अमरावती याच्या जवळच्या नातेवाईकास राष्ट्रीय मानवी हक्क आयोगाच्या आदेशानुसार आर्थिक मोबदला देणेबाबत**

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन निर्णय क्रमांकः एनएचआरसी-०९१३/प्र.क्र.८८९/१३/तुरुंग-३

मंत्रालय, मुख्य इमारत, दुसरा मजला,
मादाम कामा रोड, मुंबई-४०० ०३२.
तारीख: १० जुलै, २०१५

वाचा-

**१) सहायक निबंधक (विधि), राष्ट्रीय मानवी हक्क आयोग, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक ३६९९/१३/३/२०१२-जेसीडी, दिनांक १६ जून, २०१५**

प्रस्तावना-

मृत बंदी क्र. सी-३१६-मदनय्या रामय्या लेंकला, मोर्शी खुले कारागृह, जि. अमरावती याने कारागृहातून पलायन करुन आत्महत्या केल्याबाबतचा अहवाल राष्ट्रीय मानवी हक्क आयोगाकडे पाठविण्यात आला असता सदर बंदी मोर्शी खुले कारागृह, जि. अमरावती यांच्या नियंत्रणात असल्याने त्याच्या जिवीताचे रक्षण करण्याची जबाबदारी संबंधीत कारागृहाची आहे, असे कारण नमूद करून संदर्भ-१ मधील आदेशानुसार राष्ट्रीय मानवी हक्क आयोगाने सदर प्रकरणी मृत बंदी क्र. सी- ३१६- मदनय्या रामय्या लेंकला, मोर्शी खुले कारागृह, जि.अमरावती याच्या जवळच्या नातेवाईकास रुपये १,००,०००/-(रुपये एक लाख फक्त) इतकी रक्कम अदा करण्याची सूचना केली आहे.

## शासन निर्णय-

मृत बंदी क्र. सी- ३१६- मदनय्या रामय्या लेंकला, मोर्शी खुले कारागृह, जि. अमरावती याच्या जवळच्या नातेवाईकास राष्ट्रीय मानवी हक्क आयोगाच्या शिफारशीनुसार रु. १,००,०००/- (रुपये एक लक्ष फक्त) इतकी रक्कम अदा करण्यास शासन मान्यता देत आहे. सदर आर्थिक मोबदला अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून अधीक्षक, मोर्शी खुले कारागृह, जि. अमरावती यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी यांनी आर्थिक मोबदल्याची रक्कम सदर मृत बंद्याच्या जवळच्या नातेवाईकास तातडीने अदा करुन त्याची पोचपावती शासनास सादर करावी व कार्यपूर्ततेचा अहवाल मा. राष्ट्राय मानवी हक्क आयोग यांना सादर करावा.

याबाबतचा खर्च मागणी क्रमांक बी-५, मुख्य लेखाशीर्ष-२०५६, तुरुंग (००) १०१-"तुरुंग" (००) (०३) इतर तुरुंग (२०५६ ००५३) ५० इतर खर्च (दत्तमत) या लेखाशीर्षाखालील सन २०१५-२०१६ या आर्थिक वर्षाकरिता मंजूर असलेल्या उपलब्ध तरतूदीमधून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-पहिला, उपविभाग-तीन, अनुक्रमांक-४, परिच्छेद- २७ (२) अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७०७१०५५३३६३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Deepak Keshav Jadiye

Digitally signed by Deepak Keshav Jadiye
DN: CN = Deepak Keshav Jadiye, C = IN, S = Maharashtra, O = Govt. of Maharashtra, OU = Home Department
Date: 2015.07.10 16:22:33 +05'30'

**(दीपक जडीये)**
कक्ष अधिकारी, गृह विभाग

प्रत,

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
२. अपर पोलीस महासंचालक व पोलिस महानिरीक्षक (कारागृह), महाराष्ट्र राज्य, पुणे
३. महालेखापाल -२, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. महालेखापाल-२, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. कारागृह उपमहानिरीक्षक, पूर्व विभाग, नागपूर
६. अधीक्षक, मोर्शी खुले कारागृह, जि. अमरावती
७. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती
८. वित्त विभाग, (व्यय ८) मंत्रालय, मुंबई
९. गृह विभाग (बीयुडी-१), मंत्रालय, मुंबई
१०.गृह विभाग (तुरुंग-२), मंत्रालय, मुंबई
११.निवडनस्ती तुरुंग-३